पोलीस अधीक्षक, रायगड यांचे आस्थापनेवरील
रसायणी पोलीस ठाणे पनवेल पोलीस उपविभाग
यांचेकडून खालापूर पोलीस उपविभागास
जोडण्याबाबत व पनवेल पोलीस उपविभाग बंद
करुन मनुष्यबळ व साधनसामुग्रीसह पोलीस
आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग
करणेबाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक टीटीसी ०४१०/३८/प्र क्र ५०/पोल-३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक १४ जून, २०११

संदर्भ:-

१) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक अेपीओ ४४६५/६०९६२/V/ सचिवालय, बॉम्बे-४०००३२ दिनांक ०८ जून, १९६६
२) पोलीस महासंचालक, यांचे पत्र क्र पोमसं २६अ/नवी मुंबई/३६/२००१ दि. १९.०४.२०११
३) विशेष पोलीस महानिरिक्षक, कोकण परिक्षेत्र, कोकण यांचे पत्र क्र. ३५/इमारत/रायगड (रयासणी) खालापूर/१३१९/२०११ दिनांक ०१.०४.२०११
४) पोलीस अधीक्षक, रायगड यांचे पत्र क्र. ३७९/पशा-३/१००/रसायणी /२०११ दिनांक २१.०३.२०११

प्रस्तावना:-

पोलीस अधीक्षक, रायगड यांचे आस्थापनेवर शासन निर्णय दिनांक ०८ जुन, १९६६ अन्वये पोलीस उपविभाग पनवेल निर्माण करण्यात आला आहे. सध्या या उपविभागाच्या नियंत्रणाखाली रसायणी पोलीस ठाणे हे एकच पोलीस ठाणे कार्यरत असल्यामुळे रसायणी पोलीस ठाणे खालापूर पोलीस उपविभाग मध्ये समाविष्ठ करण्याबाबत व पोलीस उपविभाग, पनवेल पदे व साधनसामुग्रीसह पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

शासन निर्णय :-

वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने सर्वांगीण विचार करुन असा निर्णय घेतला आहे की, पोलीस अधीक्षक, रायगड यांचे आस्थापनेवरील रसायनी पोलीस ठाणे खालापूर पोलीस उपविभागास जोडण्यास व पनवेल पोलीस उपविभाग बंद करुन तो

उपविभाग, त्याकरिता शासन निर्णय दिनांक ०८ जून, १९६६ अन्वये निर्माण करण्यात आलेले मनुष्यबळ, साधनसामुग्रीसह पोलीस आयुक्त, नवी मुंबई यांचे आस्थापनेवर वर्ग करण्यास प्रशासकीय विभाग स्तरावर मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक सांकेताक २०११०६०११६३१२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(प्र. मो. वानखडे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विशेष पोलीस महानिरिक्षक, कोकण परिक्षेत्र, कोकण, नवी मुंबई
३) पोलीस आयुक्त, नवी मुंबई
४) पोलीस अधीक्षक, रायगड
५) उपविभागीय पोलस अधिकारी, पनवेल / खालापूर
६) महालेखापाल (लेखापरीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / अलिबाग, रायगड
८) कार्यासन अधिकारी, पोल-१अ/ पोल-४/ पोल-७/ बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवड नस्ती (पोल-३)